आषाढी एकादशीनिमित्त देहू ते पंढरपूर तसेच आळंदी ते पंढरपूर या दोन पालखीमार्गावर विविध माध्यमांव्दारे आपत्ती व्यवस्थापन विषयक जनजागृतीकरीता प्रसिध्दी माध्यम आराखड्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**(आपत्ती व्यवस्थापन प्रभाग)**
**शासन निर्णय क्रमांकः आव्यप्र-२०२५/प्र.क्र.११२/आव्यप्र-१**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, १ ला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक :-१९ जून २०२५**

**वाचा**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक मावज-२०१८/प्र.क्र.२३९/कार्यासन-३४, दिनांक २६.०३.२०२०
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक मावज/२०२१/प्र.क्र.१२६/कार्यासन-३४, दिनांक १३.०८.२०२१

**प्रस्तावना**

आषाढी एकादशी निमित्त दरवर्षी पंढरपूर येथे मोठी यात्रा भरते. सदर यात्रेला प्रदिर्घ संत परंपरा लाभलेली आहे. आषाढी एकादशी निमित्त दरवर्षी देहू ते पंढरपूर व आळंदी ते पंढरपूर या दोन्ही पालखी मार्गावरुन श्री. संत ज्ञानेश्वर महाराज व जगतगुरु तुकाराम महाराज यांच्या पालखींवेळी लाखो वारकरी पायी वारीमध्ये सहभागी होवून श्री. विठ्ठल दर्शनाकरीता पंढरपूरकडे प्रस्थान करतात. सदर बाब विचारात घेवून आषाढी वारी निमित्त देहू ते पंढरपूर व आळंदी ते पंढरपूर या दोन पालखी मार्गावर पालख्यांमध्ये सहभागी होणाऱ्या भाविकांमध्ये तसेच राज्यातील नागरीकांमध्ये राज्यात उद्भवणाऱ्या विविध नैसर्गिक तसेच मानवनिर्मित आपत्तीसंदर्भात चित्ररथ, एलईडी बसविलेले वाहन, पथनाट्य, लोककला, मोबाईल स्टॉल, सेल्फीपॉईंट व इतर अनुषंगिक प्रकाशने अशा विविध माध्यमांच्या सहाय्याने जनजागृती करण्यासाठी तयार करण्यात आलेल्या माध्यम आराखड्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

आषाढी वारी निमित्त देहू ते पंढरपूर व आळंदी ते पंढरपूर या दोन पालखी मार्गावर पालख्यांमध्ये सहभागी होणाऱ्या भाविकांमध्ये तसेच राज्यातील नागरीकांमध्ये राज्यात उद्भवणाऱ्या विविध नैसर्गिक तसेच मानवनिर्मित आपत्तीसंदर्भात आषाढी वारी कालावधीत चित्ररथ, एलईडी बसविलेले वाहन, पथनाट्य, लोककला, मोबाईल स्टॉल, सेल्फीपॉईंट व इतर अनुषंगिक प्रकाशने अशा विविध माध्यमांच्या सहाय्याने जनजागृती करण्यासाठी तयार करण्यात आलेल्या खालील माध्यमाव्दारे प्रसिध्दी करण्याकरीता संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ व २ मधील तरतुदीनुसार प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | माध्यम | तपशिल | संख्या | अंदाजे खर्च |
|---|---|---|---|---|
| १ | **निर्मिती साहित्य** | **माहितीपट निर्मिती** (४ ते १२ मिनिटे ) | ४ | **रु.**३९,००,०००/- |
| | | **ऑडिओ जिंगल/स्पॉट** (४५ ते ६० **सेकंद** (प्रत्यकी) | ५ | **रु.**२,२५,०००/- |
| २ | **चित्ररथ, पथनाट्य आणि लोककला, एलईडी व्हॅन, मोबाईल स्टॉल आणि सेल्फी पॉईंट** | १९ **दिवस जनजागृती दोन्ही पालखी मार्गावर सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करून जनजागृती करणे.** | **प्रत्येकी** २ | **रु.**२,८६,५०,०००/- |
| | **एकूण अंदाजे खर्च** | | | **रु.**३,२७,७५,०००/- |
| | **वस्तु व सेवा कर** | | | **रु.**५८,९९,५००/- |
| | **वस्तु व सेवा करांसह एकूण अंदाजित खर्च** | | | **रु.**३,८६,७४,५००/- |
| | **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक** १३.०८.२०२१ **नुसार माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजावणी समितीने मान्य केल्यानुसार खर्च** | | | **रु.**१३,११,०००/- |
| | **एकूण अंदाजे खर्च** | | | **रु.३,९९,८५,५००/-** |

०२. उपरोक्त नमूद प्रसिध्दीची कार्यवाही ही सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक २ येथील दिनांक १३.०८.२०२१ मधील तरतुदीनुसार माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत करण्यात यावी.

०३. प्रसिध्दीकरीता विहित कार्यपध्दतीचा अवलंब करून माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत निवड करण्यात आलेल्या संस्थेकडून उपरोक्तपैकी अ.क्र.१ येथे नमूद करण्यात आलेल्या प्रसिध्दीची कार्यवाही ही आषाढी वारी कालावधीत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून निर्गमित करण्यात येणाऱ्या कार्यादेशातील अटी-शर्तीनुसार करण्यात यावी. प्रसिध्दीसंदर्भातील आवश्यक सर्व पुरावे सादर करण्याची जबाबदारी संबंधीत संस्थेची राहील. तसेच उपरोक्त माध्यमाव्दारे प्रसिध्दी करतांना राज्य व केंद्र शासनाने अधिसुचित केलेल्या आपत्तींबाबत, (राज्यात उद्भवणाऱ्या आपत्ती- चक्रिवादळ, दुष्काळ, आग, पुर, गारपीट, दरड कोसळणे, ढगफुटी, टोळधाड, अवेळी पाऊस, अतिवृष्टी, वीज कोसळणे, समुद्राचे उधान, सततचा पाऊस, उष्माघात इ.) राज्य शासनाकडून वेळोवेळी करण्यात येणाऱ्या उपाययोजना, घेण्यात आलेले धोरणात्मक निर्णय याबाबत जनजागृती व प्रसिध्दी करण्यात यावी.

०४. ज्या संस्थेकडून उपरोक्त नमूद प्रसिध्दीची कार्यवाही करण्यात येणार आहे त्या संस्थेकडून खालील बाबींची पूर्तता करणे बंधनकारक करण्यात यावे.

अ) अनुक्रमांक १ मध्ये नमुद केलेल्या प्रसिध्दीसाठी निर्मिती करण्यात येणारा (दृक श्राव्य) मजकूर माहितीपट, व्हिडिओ व इतर अनुषंगिक निर्मिती यावर विभागाचे मालकी हक्क असल्याने त्याची Soft Copy या विभागास सादर करणे बंधनकारक राहील.

आ) सदर प्रसिध्दीसंदर्भातील ठिकाणांचे Geo Tagging Photo विभागास सादर करणे आवश्यक राहील. प्रसिध्दीसंदर्भातील कार्यक्रमाची व्हिडीओग्राफी करण्यात यावी. त्यात दिनांक व वेळ असणे आवश्यक राहील.

इ) उपरोक्त माध्यम आराखडयासंदर्भातील देयके ही माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत निर्गमित करण्यात येणाऱ्या कार्यादेशातील अटी-शर्तीनुसार विहीत प्रचलित कार्यपद्धती प्रमाणे करण्यासाठी या विभागाकडे सादर करावीत. विभागातील घोषित करण्यात आलेल्या आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी यांच्याकडून सदर देयके अदा करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

०५. या बाबीवर होणारा खर्च "मागणी क्रमांक सी- ६, ८०, सर्वसाधारण, ००१, संचालन व प्रशासन (०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, (०१)(०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे कार्यालय स्थापन करणे तसेच फर्निचर व साधनसामुग्रीसह सुसज्जीकरण करणे (कार्यक्रम) लेखाशिर्ष क्रमांक (२२४५१७६१) २६-जाहिरात व प्रसिध्दी" या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षाकरीता उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

०६. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ अन्वये निर्गमित वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग चार, अनुक्रमांक-११ अन्वये विहित केलेल्या अटींच्या अधीन राहून, विभागास प्राप्त अधिकार, नियोजन विभाग आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३७/२०२५/व्यय-९ दिनांक ०९.०६.२०२५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०६१९१२४३२९८९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by DATTATRAY HANMANT KADAM
Date: 2025.06.19 12:45:01 +05'30'

( दत्तात्रय कदम )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आपत्ती व्यवस्थापन, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, आपत्ती व्यवस्थापन विभाग, यांचे स्वीय सहाय्यक.

६. सहसचिव व वित्तीय सल्लागार. आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.

७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागूपर.

९. महालेखापाल, लेखा परिक्षा, १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागूपर.

१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

११.लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग (आव्यप्र-६), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२.निवडनस्ती आव्यप्र-१/मंनिक-२